**० ते १०० हे.सिं.क्ष. नवीन/प्रगतीपथावरील प्रकल्पांच्या कामांकरिता निधीचे वितरण: जि. यवतमाळ**
**(विदर्भ विभाग)**

---

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र.नवीन-२०२४/प्र.क्र. ६४२/जल-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती कार्यालयाचे पत्र जा.क्र. असंलि/**१५७**/२०२५, दिनांक २२ जानेवारी, २०२५.

**प्रस्तावना :** बिगर आदिवासी क्षेत्रातील ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या नवीन/ प्रगतीपथावरील लघुसिंचन (जलसंधारण) प्रकल्पांच्या कामांकरिता मागणी क्र.झेडएच-५, लेखाशीर्ष ४७०२ ए०१९ खाली सन २०२४-२५ मध्ये रुपये २००.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. आता वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकांनुसार सुधारित अंदाजाच्या मर्यादेत योजनेखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून संदर्भीय दिनांक २२/०१/२०२५ येथील निधी मागणी प्रस्तावांवर खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**निर्णय :** **यवतमाळ** जिल्ह्याच्या कळंब तालुक्यातील **को.प. बंधारा पहूर-मेटीखेडा-१ व पहूर-मेटीखेडा-२** या ०२ प्रकल्पांच्या झालेल्या बांधकामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी एकूण **रुपये २७.४९ लक्ष (अक्षरी रुपये सत्तावीस लक्ष एकोणपन्नास हजार फक्त)** एवढा निधी वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

२. उपरोक्त निधी पुढील सर्वसाधारण अटी व शर्तींच्या अधीन वितरित करण्यात येत आहे :-

अ) वरील प्रकल्पांच्या कामांकरिता जलसंधारण महामंडळ, जिल्हा नियोजन समिती अथवा अन्य स्त्रोताकडून निधी उपलब्ध झाला असल्यास, याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या निधीचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,

ब) प्रशासकीय मान्यतेच्या तसेच शासनाने मान्य केलेल्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीपेक्षा जास्तीचा निधी खर्च करण्यात येवू नये,

क) वरील प्रकल्पांच्या कामासाठी निधीची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रकल्पासाठी वितरित करण्यात येवू नये,

ड) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर निधी तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावा,

ई) निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.

फ़) कामांच्या गुणवत्तेची खात्री करुन देयक अदा करावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४ यावर होणारा खर्च पुढील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेडएच-५,

४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च

१०१, भूपृष्ठ जल

(०१) लहान पाटबंधारे

(०१)(०१) लहान पाटबंधारे योजना (४७०२ए०१९)

० ते १०० हे.सिं.क्ष. (कार्यक्रम)

५३, मोठी बांधकामे

५. उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरीत प्रती तसेच प्रकल्प पुर्णत्वाचे प्रमाणपत्र विहित मार्गाने शासनास सादर करावे.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांची राहिल व अप्पर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, नागपुर हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३३११७५६५५२२२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.31 17:57:46 +05'30'

**(रा.हे. बागडे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, नागपुर.

२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.

३) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, यवतमाळ.
४) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
६) मृद व जलसंधारण विभाग (जल-११) मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / जल-४.

**<u>प्रत अग्रेषित,</u>**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता).
५. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर.